महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब संवर्गातील सहायक गट विकास अधिकारी यांच्या तदर्थ पदोन्नतीच्या पदस्थापनेत बदल करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन आदेश क्रमांकः** मविसे-११२४/प्र.क्र.१४/आस्था-३ अ

३ रा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई-०१

तारीख: १५ मार्च, २०२४

**वाचा :**

१) **ग्राम विकास विभाग, शासन आदेश समक्रमांकः** दिनांक २९ फेब्रुवारी, २०२४

२) **मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांचे अर्ध शासकीय पत्र क्रमांकः** जिपनां/स्वीय सहायक/मुकाअ/ /२०२४, दिनांक ०१ मार्च, २०२४.

**शासन आदेश :**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतूदीनुसार, श्री.ए. एस. नलावडे यांना सहायक गट विकास अधिकारी, (ग्रामपंचायत), जिल्हा परिषद, नांदेड या पदावर उक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील ग्राम विकास विभागाच्या दिनांक २९ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या आदेशान्वये सरळसेवा कोट्यातील रिक्त पदावर तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली होती. सदर आदेशातील छत्रपती संभाजीनगर विभागातील श्री.ए. एस. नलावडे यांच्या पदोन्नतीच्या पदस्थापनेत बदल करून त्यांना स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी सुधारित पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | दिनांक २९ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या आदेशान्वये तदर्थ पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | तदर्थ पदोन्नतीने सुधारित पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.ए. एस. नलावडे, सहायक गट विकास अधिकारी | सहायक गट विकास अधिकारी, (ग्रामपंचायत), जिल्हा परिषद, नांदेड | गट विकास अधिकारी (मनरेगा), जिल्हा परिषद, नांदेड | श्री.मिरजकर यांच्या जागी |

**०२.** सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून संबंधित अधिकारी यांनी सुधारित पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रूजू व्हावे. तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये.

**०३.** मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांनी सदर आदेशाची तात्काळ अंमलबजावणी करून श्री.ए. एस. नलावडे यांना सुधारित पदस्थापनेच्या पदावर रूजू करून घ्यावे व अनुपालन अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

**०४.** उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील ग्राम विकास विभागाच्या दिनांक २९ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या शासन आदेशात नमुद केल्याप्रमाणेच श्री.ए. एस. नलावडे यांच्या तदर्थ पदोन्नतीबाबत इतर अटी व शर्ती लागू राहतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४२१२८१६९३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2024.03.15 12:53:01 +05'30'

**(डॉ. उर्मिला जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (ग्रा.वि.), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
६. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नांदेड.
९. संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत).
१०. अवर सचिव (आस्था-२), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती, कार्यासन आस्था-३ अ, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.